सन २०२३-२४ निधी वितरण
३४ - शिष्यवृत्ती/विद्यावेतन

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पुरक-२०२३/प्र.क्र.७१/ एसडी-५**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक :- ०४ मार्च, २०२४

**संदर्भ :-**

१) शिक्षण संचालक, योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.०२.११.२०२३ रोजीचे पत्र
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक:- निधिवि २०२३/प्र.क्र.५०/एसडी-५, दि.१५.०९.२०२३ व दि.३०.०१.२०२४
३) वित्त विभागाचे क्र. अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ चे परिपत्रक

**प्रस्तावना :-**

राज्यातील गुणवान विद्यार्थ्यांना शिक्षणासाठी प्रोत्साहीत करण्याकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात ३४- शिष्यवृत्ती / विद्यावेतन या उद्दिष्टाखाली निधी वित्त विभागाने वितरीत केलेल्या १०० टक्के निधीच्या प्रमाणात संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निधी वितरीत केलेला आहे.

२. सदर योजनेकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता लेखाशीर्ष २२०२ २३१८ या लेखाशीर्षाखाली
अर्थसंकल्पित निधी व पुनर्विनियोजनाने उपलब्ध करवून देण्यात आलेला निधी अपुरा पडत असल्याने पुरवणी मागणीबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. सबब ३४- शिष्यवृत्ती / विद्यावेतन या उद्दिष्टाखाली वित्त विभागाने पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या प्रमाणात निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात गुणवान विद्यार्थ्यांना प्रोत्साहन देण्यासाठी राज्यातील शाळांमधील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देण्यासाठी विविध योजना कार्यन्वित आहेत. पूर्व माध्यमिक व माध्यमिक शाळा गुणवत्ता शिष्यवृत्ती योजनामध्ये इयत्ता ५ वी व ८ वी मधील विद्यार्थ्यांची महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद यांचेमार्फत घेण्यात येणा-या स्पर्धात्मक परीक्षेच्या निकालाच्या अनुषंगाने गुणवत्तेच्या आधारे शिष्यवृत्तीचे वाटप करण्यात येते. पूर्व माध्यमिक व माध्यमिक शाळा गुणवत्ता शिष्यवृत्तीच्या दरामध्ये दि.०३.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वाढ करण्यात आली आहे. त्यानुसार इयत्ता ५ वी करीता सर्व संचाकरीता रु.५००/- प्रतिमाह प्रमाणे १० महिन्यांकरीता रु.५०००/- व इयत्ता ८ वी करीता रु.७५०/- प्रतिमाह प्रमाणे १० महिन्यांकरीता रु.७५००/- इतकी शिष्यवृत्ती निश्चित करण्यास मान्यता दिली आहे.

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर अर्थसंकल्पित तरतुदीमधून वित्त विभागाने वितरीत केलेल्या १०० टक्के निधीच्या प्रमाणात "ई-०२, २२०२, सर्वसाधारण शिक्षा, ०२-माध्यमिक शिक्षण १०७- शिष्यवृत्त्या, २२०२२३१८ (उच्च माध्यमिक शाळा), ३४ शिष्यवृत्त्या व विद्यावेतने" या लेखाशीर्षाखाली पुरवणी मागणीद्वारे रु.१२,४६,०७,०००/- (अक्षरी रु. बारा कोटी शेहचाळीस लक्ष सात हजार फक्त ) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर निधी वितरीत करण्यास तसेच अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे.

२. वरील सदर बाबींवर होणारा खर्च उपरोक्त नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी तसेच लेखाधिकारी (लेखा), शिक्षण संचालनालय योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. याबाबतीत वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेली मार्गदर्शक तत्त्वे / शासन निर्णय / शासन परीपत्रक यामधील सूचनांचे पालन करणे आवश्यक राहील.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ८१/१४७१, दि. ०९.०२.२०२४ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. २४४/व्यय-५, दि.२०.०२.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०४१६५२१२४५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.04 17:41:10 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३ आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे.
७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
८. लेखाधिकारी (लेखा), शिक्षण संचालनालय योजना, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती. (एसडी-५)